महाराष्ट्र राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत यशदा, पुणे येथे आयोजित प्रशिक्षण कार्यक्रमाचे देयकासाठी रु.१८,७५,०००/-इतक्या रक्कमेचा निधी वितरीत करणेबाबत

महाराष्ट्र शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग
शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण-२०१५/प्र.क्र.३०/५-स
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ३१ मार्च, २०१५

वाचा :- १) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.टिआरएन०९/प्र.क्र.३९/०९/१२अ, दि.२३/९/२०११

२) समक्रमांकाचा शासन निर्णय दि.१९/०३/२०१४

३) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय दि.९/५/२०१४

४) निबंधक, यशदा, पुणे यांचे पत्र क्र.प्रशा-१/३५१४/सीपीटीपी/निधी-१, दि.२१/८/२०१४

५) उपमहासंचालक, यशदा, पुणे यांचे अ.शा.पत्र क्र.प्रशा-१/३५१४/सीपीटीपी/निधी-१, दि.३०/१२/२०१४

प्रस्तावना :-

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधिन क्र.१ च्या अनुषंगाने अधिकारी व कर्मचाऱ्यांना प्रशिक्षण देण्याबाबतचे राज्य शासनचे प्रशिक्षण धोरण निश्चित झाले आहे. सदर धोरणानुसार मुख्य सचिवांच्या अध्यक्षेतेखाली राज्य प्रशिक्षण कृती दल स्थापन केले असून यशदा, पुणे ही शिखर प्रशिक्षण संस्था म्हणून कार्यरत राहणार आहे.

सा.प्र.विभाग, शासन निर्णय दि.९/५/२०१४ मधील मुद्दा क्र.३ अन्वये एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यकमाअंतर्गत रुजू झालेल्या गट-अ संवर्गातील परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना प्रशिक्षण कालावधीमध्ये रु.३० हजार प्रती महिना या प्रमाणे ठोक वेतन अदा करावयाचे आहे. त्या अनुषंगाने शासन निर्णयातील मुद्दा क्र.४ अन्वये परिविक्षाधीन अधिकाऱ्याच्या जून महिन्याच्या ठोक वेतनासाठी मे, २०१४ अखेर व त्यापुढील ठोक वेतनासाठी दर तिमाहीस (जून- २०१४, सप्टेंबर-२०१४, डिसेंबर-१४ व मार्च-२०१५) दोन वर्षाचा प्रशिक्षण कार्यक्रम पूर्ण होईपर्यत संबंधित विभागाने यशदा, पुणे यांना निधी उपलब्ध करुन द्यावयाचा आहे. एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमाअंतर्गत यशदा, पुणे येथे दि.९/६/२०१४ रोजी २१ परिविक्षाधीन जिल्हा उपनिबंधक रुजू झालेले आहेत. त्यांच्या प्रतिमहा वेतनाचा खर्च २१x ३०,०००= रु.६,३०,०००/- इतका असल्याची बाब पत्रात नमूद केली असून श्रीमती

आरती तुकाराम जाधव, परिविक्षाधीन जिल्हा उपनिबंधक यांनी वैयक्तीक कारणास्तव दिलेला राजीनामा शासनाने मंजूर केल्याने त्यांना दि.२/८/२०१४ रोजी कार्यमुक्त करण्यात आले आहे. त्यामुळे सद्य:स्थितीत यशदा, पुणे येथे २० परिविक्षाधिन जिल्हा उपनिबंधक कार्यरत आहेत. या परिविक्षाधीन जिल्हा उपनिबंधकांचे माहे जून व जुलै २०१४ या दोन महिन्याचे ठोक वेतन एकूण रु.१२,६०,०००/- यशदाच्या निधीतून अदा करण्यात आलेले आहे. सदर निधी यशदाला उपलब्ध करुन देण्याबाबत निबंधक, यशदा पुणे यांनी विनंती केली आहे. तसेच यापुढील निधी दर तिमाहीस यशदा, पुणे या कार्यालयाच्या आय.डी.बी.आय. या बँकेच्या खाते क्र.०६२१०४००००६५६६३ या खात्यावर जमा करण्याची विनंती करण्यात आली आहे. सदर प्रशिक्षणासाठी झालेल्या रु.१९,७४,०००/- रकमेचे देयक यशदा, पुणे यांचे कडून सादर करण्यात आले असून सदर निधी यशदा, पुणे यांना अदा करण्यासाठी सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था पुणे यांना उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.त्यानुषंगाने खालील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय -**

सन २०१४-१५ या आर्थिक वर्षासाठी Expenditure of Training Policy या योजने अंतर्गत ३४५१ २९०६ या लेखाशिर्षाखाली करण्यात आलेल्या तरतुदीतून वरील रु.१८,७५,०००/-इतका निधी मंजूर करण्यात येत असून सदर निधी पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. उर्वरित रु.९९,०००/- इतका निधी वेगळयाने सन २०१५-१६ या अर्थिक वर्षाच्या तरतूदीतून उपलब्ध करुन देण्यात येईल.

| अ.क्र. | लेखाशिर्ष | मंजूर निधी |
|---|---|---|
| १ | मागणी क्र.व्ही-२, ३४५१<br>सचिवालयीन आर्थिक सेवा, ००३,सचिवालयीन आर्थिक सेवा (००) (०१), शासकीय कर्मचाऱ्यांना प्रशिक्षण,५० इतर खर्च (३४५१ २९०६) | १८,७५,०००/- |

उपरोक्त उपलब्ध करुन दिलेला रु.१८,७५,०००/-लक्ष (रुपये एकोणीस लक्ष पंच्याहत्तर हजार फक्त) निधीचा खर्च सन २०१४-१५ या चालू वर्षाच्या Expenditure of Training Policy अंतर्गत करण्यात

आलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदी मधून भागविण्यासाठी सदर निधी सहकार आयुक्त व निबंधक यांना उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

| अ.क्र. | विभागाचे नांव | सन २०१४-१५ करीता मंजूर निधी | नियंत्रण अधिकारी (क्ष) | आहरण व संवितरण अधिकारी (य) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग | १८,७५,०००/- (सुधारीत तरतुद) | श्री.पां. स. देवकर, उपसचिव (क्षेत्रिय आस्थापना), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई ३२. | श्रीमती अ.अ.चुरी, कार्यासन अधिकारी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ |

३ परिच्छेद क्र.२ येथील तक्त्यातील “क्ष” आणि “य” मधील रकान्यात दर्शविलेल्या अधिकाऱ्यांना संबंधित विभागाकरीता अनुक्रमे नियंत्रण अधिकारी व आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. या शासन निर्णयान्वये मंजूर एकूण रु.१८,७५,०००/-इतक्या रक्कमेचा निधी श्री.पां.स.देवकर, उपसचिव (क्षेत्रिय आस्थापना), यांना थेट अर्थसंकल्पीय प्रणालीव्दारे उपलब्ध करुन देण्यात येत असून त्यांनी सदर निधी परि.२ येथील तक्त्यामधील संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीव्दारे वितरीत करावयाचा आहे. आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी सदर निधी सहकार आयुक्त व निबंधक, पुणे यांना RTGS सुविधेव्दारे अदा करावेत.

४ सहकार आयुक्त व निबंधक यांनी यशदा,पुणे यांच्या संदर्भांकित क्र.४ येथिल प्रस्तावाच्या अनुषंगाने मंजूर निधीच्या मर्यादेतच विनियोग करावा.

५ या शासन निर्णयान्वये मंजूर निधीचा विनियोग आणि यासंदर्भातील अनुपालन अहवाल व निधी उपयोगिता प्रमाणपत्र सहकार आयुक्त व निबंधक, पुणे यांनी सादर करावे.

हा शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या मान्यतेने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१८५/१५/व्यय-२, दि.३०/०३/२०१५ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेनुसार व शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अंदाज२०१३/प्र.क.८५/ अर्थसंकल्प-३ दि.२५/४/२०13 नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३११६३११००५०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pandurang S Deokar

Digitally signed by Pandurang S Deokar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pandurang S Deokar
Date: 2015.03.31 16:41:43 +05'30'

**( पां. स. देवकर )**

**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी सेस्था,पुणे
२. मा.मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.राज्यमंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. संचालक, यशदा, पुणे.
५. सचिव(सहकार), मंत्रालय, मुंबई यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
६. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
७. निवासी लेखापरीक्षा अधिकारी
८. अवर सचिव/कक्ष अधिकारी (१७-स/रोखशाखा/१२-स),स.प.व व. विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
९. कक्ष अधिकारी (व्यय-२), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१०.निवडनस्ती (५-स)